**चिकोत्रा मध्यम प्रकल्पांतर्गत को.प.बंधा-यांच्या विशेष दुरूस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/(४८० /१४)/ सिंव्य(कामे)

मंत्रालय, मुंबई

तारीख: २६ /०८/२०१४

**वाचा**

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/१६/(७४२ /१४) /प्रशा ४/६३२८ दि.१६.८.२०१४

**प्रस्तावना**

चिकोत्रा मध्यम प्रकल्प अंतर्गत को.प.बंधारे हे ३० ते ५० वर्ष जुने झाले असल्यामुळे क्षतिग्रस्त झालेले आहे. सदर को.प.बंधा-यांची ब-याच प्रमाणात पडझड झाली असल्यामुळे व बरगे खराब झाल्यामुळे दरवर्षी बंधा-यामध्ये पाणी अडविण्यासाठी अडचणी निर्माण होतात. त्यामुळे बंधा-यामध्ये निर्धारीत पाणीसाठा करता येत नाही. पर्यायाने त्याचा सिंचनासाठी अपुऱ्या प्रमाणात पाणी पुरवठा होता. यास्तव तेथील सिंचन वसुली पूर्णपणे होत नाही. सदरच्या बंधाऱ्याची गळती थांबविल्यास त्यामध्ये पुरेसा पाणीसाठा होवून सिंचनासाठी आवश्यक तितके पाणी उपलब्ध होणार आहे. पर्यायाने सिंचन वसुलीमध्ये / शासकीय महसूलात लक्षणीय वाढ अपेक्षित आहे. यास्तव चिकोत्रा प्रकल्पांतर्गत बंधा-यांची विशेष दुरूस्ती अंदाजपत्रके सादर करण्यात आली असून त्यात पुढील कामांचा अंर्तभाव करण्यात आलेला आहे .लघु बंधारे क्र. १ ते १९, नंद्याळ को प बंधारा, मेतके को प बंधारा, अर्जुनवाडा को प बंधारा, गलगले को प बंधारा, बेंळुकी को प बंधारा यांची दुरुस्ती प्रस्तावित आहे. सदर कामाअंतर्गत २ को प बंधाऱ्याची विशेष दुरुस्ती व २६ को प बंधाऱ्याला लोखंडी बर्गे पुरवठा होणार आहे. या बाबी लक्षात घेता सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय -**

या शासन निर्णयाव्दारे चिकोत्रा मध्यम प्रकल्पांतर्गत को.प.बंधा-यांच्या विशेष दुरूस्ती ता कागल , जि.कोल्हापूर विशेष दुरूस्ती कामास रु. ६१.९३लक्ष (कामावरील खर्च रु ५६.३० लक्ष व रु ५.६३ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)को प बंधाऱ्याची विशेष दुरुस्ती करतांना अस्तित्वातील को प बंधाऱ्याचे वापरायोग्य बांधकाम साहित्य (उदा. लोखंडी फळया Needle) चा वापर करण्यात यावा.

२) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी .

३) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Mile Stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार mile stones साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात

दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

५) यांत्रिकी संघटनेमार्फत करता येण्यासारखी विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी विभागाकडूनच करुन घेण्यात यावे

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा व विशेष दुरुस्ती (१०)(०१ ) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ७४५२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ४६ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग-पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार आंतर वित्तीय सल्लागाराच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२७१९२०४३६४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.08.27 19:17:17 +05'30'

**(य.का.भदाणे)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई

६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता,सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/( ४८० /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक २६.०८.२०१४ चे प्रपत्र

**परिशिष्ट**

| अ.क्र | कामाचे नांव | अंदाजपत्रकीय किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|
| १ | लघु बंधारे क्रमांक १ ते १९ ची विशेष दुरुस्ती | २१.९३ |
| २ | नंद्याळ को.प.बंधारा | १४.३८ |
| ३ | मेतके को.प.बंधारा | ८.३२ |
| ४ | अर्जुनवाडा को.प.बंधारा | ५.२३ |
| ५ | गलगले को.प.बंधारे | ५.२२ |
| ६ | बेळुंकी को.प.बंधारा | १.२२ |
| | **एकूण किंमत** | **५६.३०** |
| | इ.टी.पी. चार्जेस | ५.६३ |
| | **एकूण किंमत** | **६१.९३** |

| अ.क्र | शिर्ष/ उपशिर्ष निहाय कामाचे नांव | अंदाजपत्रकीय किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|
| १ | सी-कामे | ५६.३० |
| | **एकूण** | **५६.३०** |
| | १० टक्के इ.टी.पी.चार्जेस | ५.६३ |
| | **एकूण** | **६१.९३** |

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.08.27 19:17:46 +05'30'

(य.का.भदाणे)
शासनाचे अवर सचिव